**मुळा पाटबंधारे प्रकल्प ता. राहुरी जि. अहमदनगर**
**सातवी सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र. सुप्रमा १२२०/प्रक्र. ३९०/२० मोप्र-१**
मादाम कामा मार्ग , हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: १५ /०२/२०२३

__संदर्भ__:- १) शासन निर्णय पाटबंधारे विभाग क्र मुळा-९९७/ सा- २६४३१ (५५०/९७) मोप्र-१ दि. ०९/०७/१९९९
२) शासन निर्णय क्र. मुळा- सुप्रमा-१११० (६५१/१०) मोप्र-१ दि. २२/११/२०११

**__प्रस्तावना__ –**

अहमदनगर जिल्हयातील राहुरी तालुक्यातील मौजे बारगांव येथे बांधण्यात आलेल्या मुळा धरणाचे काम सन १९७२ मध्ये पूर्ण करण्यात आले. मुळा प्रकल्पाचे एकुण लाभक्षेत्र ८७१५९ हे. असून अहमदनगर जिल्हयातील राहुरी, नेवासा, नगर व पाथर्डी या तालुक्यांत असुन सदयस्थितीत ८६०३७ हे. सिंचन क्षेत्रास लाभ होत आहे.

मुळा प्रकल्प ता. राहुरी जि. अहमदनगर या प्रकल्पास संदर्भ क्र. २ अन्वये रु २६२.३२ कोटी इतक्या रकमेस सहावी सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती.

कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा विकास महामंडळ, औरंगाबाद यांच्याकडुन दि १६/१०/२०२० रोजीच्या पत्रान्वये प्राप्त सातवा सुप्रमा प्रस्ताव हा सन २०१७-१८ च्या दरसुचीवर आधारीत रु ३१७.०६ किंमतीचा आहे. सातवा सुप्रमा प्रस्तावानुसार प्रकल्पाचे लाभव्यय गुणोत्तर १.५५ येत असुन आर्थिक परतावा दर ११.८०% इतका आहे. या प्रकल्पास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती त्या अनुषंगाने खालील प्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

**__शासन निर्णय:__**

अहमदनगर जिल्हयातील मुळा पाटबंधारे प्रकल्पास सन २०१७-१८ च्या दरसुचीवर आधारित रु ३१७.०६ कोटी किंमतीच्या सातवा सुधारीत प्रकल्प अहवालास खालील अटींच्या अधीन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. प्रकल्पाचे काम नियोजनानुसार व सुधारीत प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करण्यात यावे.

२. संपूर्ण लाभक्षेत्रामध्ये पाणी वापर संस्था स्थापन करून सिंचन व्यवस्थापन पाणी वापर संस्थेस हस्तांतरण करावे.

३. सदर योजनेसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजुर सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही या संदर्भात प्रचलित शासन निर्णय, नियम,CVC ची मार्गदर्शक तत्वे, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपध्दती याची काटेकोरपणे अमलबजावणी करण्याची जबाबदारी महामंडळाची राहील.

५ सर्व तांत्रिक व वैधानिक मान्यता सक्षम स्तरावरून प्राप्त करून घेण्याची जबाबदारी महामंडळाची राहील.

६. मुळा प्रकल्पाच्या रू.९७.९८ कोटी किंमतीच्या वांभोरी चारी टप्पा क्र-२ या घटकासाठी ०.९८ हे. वनजमीनीबाबतची मान्यता प्राथम्याने घ्यावी.

७. सदर प्रकल्पा संदर्भात आधीच्या कालावधीमध्ये जर काही आर्थिक व कार्यपध्दतीत अनियमितता झाल्या असतील, कोणतीही नियमबाहय कार्यवाही करण्यात आली असेल अथवा ज्यामुळे आर्थिक घोटाळा निर्माण होण्याची शक्यता असेल अशा कोणत्याही बाबींना सहमती आहे, असे गृहीत धरता येणार नाही.

८. राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीच्या अहवालातील मुद्यांची पुर्तता करावी.

९. आर्थिक दायित्व निर्माण होईल अशा नवीन घटकांचा शासन मान्यतेशिवाय प्रकल्पात समावेश करू नये.

१०. सदर सुधारीत प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी निविदाविषयक क्षेत्रिय निर्णय किंवा अनियमितता यास मान्यता गृहीत धरली जाणार नाही. अशा प्रकारची तपासणी त्या वेळेच्या प्रचलित शासन निर्णयानुसार करण्याची जबाबदारी महामंडळाची राहील.

प्रकल्पाच्या उपशिर्षनिहाय तरतुदींचा गोषवारा परिशिष्ट 'अ' मध्ये सोबत जोडला आहे.

या प्रकल्पाच्या कामावर होणारा खर्च ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे, यावरील भांडवली खर्च - पंचवार्षिक योजनांतर्गत (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका (नऊ) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास, महामंडळास भागभांडवली अंशदान या खाली खर्ची टाकावा व त्याखालील मंजुर अनुदानातुन भागविण्यात यावा. निधी उपलब्ध झाल्याशिवाय प्रकल्पावर खर्च करू नये.

हा शासन निर्णय नियोजन विभाग अनौपचारिक संदर्भ क्र. १०७/२०२२ का. १४३३ व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र. २०३/२०२२/व्यय-१२ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आपका असुन त्याचा संकेतांक २०२३०२१५१७२०४३५५२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

PRASAD RAMCHANDRA NARVEKAR

Digitally signed by PRASAD RAMCHANDRA NARVEKAR
DN: CN = PRASAD RAMCHANDRA NARVEKAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.02.15 17:24:40 +05'30'

**सहपत्र: परिशिष्ट 'अ'**

**(प्रसाद नार्वेकर)**
**उपसचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत** : १) मा. राज्यपाल महाराष्ट्र राज्य, मुंबई

२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

३) मा उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

४) स्वीय सहाय्यक, मा. मंत्री / मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

५) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद / विधानसभा, विधान भवन, मुंबई

६) स्वीय सहाय्यक, प्रधान सचिव(जसं) मंत्रालय, मुंबई

७) स्वीय सहाय्यक, सचिव(लाभक्षेत्र विकास) जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई
८) महालेखापाल-१/२, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपुर
९) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
१०) मुख्य अभियंता (द. व प्र.) व सहसचिव, जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई
११) मुख्य अभियंता उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक
१२) स्वीय सहाय्यक, आंतरवित्त सल्लागार व उपसचिव (जसं) मंत्रालय, मुंबई
१३) स्वीय सहाय्यक, उपसचिव (मोप्र-१) जलसंपदा विभाग मंत्रालय, मुंबई
१४) अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण , अहमदनगर
१५) कार्यकारी अभियंता अहमदनगर मध्यम प्रकल्प विभाग, अहमदनगर
१६ अवर सचिव (मोप्र-१) जलसंपदा विभाग मंत्रालय, मुंबई
१७) नियोजन विभाग (कार्यासन १४३४) मंत्रालय, मुंबई
१८) वित्त विभाग कार्यासन व्यव - १२/अर्थ-२, मंत्रालय, मुंबई
१९) कार्यासने जसंअ, निवसं-१, अर्थ १, जलसंपदा विभाग मंत्रालय, मुंबई
२०)निवड धारिका मोप्र-१.

## परिशिष्ठ "अ"

**मुळा प्रकल्प ता. राहुरी जि. अहमदनगर**

**शासन निर्णय क्र.** सुप्रमा १२२० /प्रक्र. ३९०/२० मोप्र-१ दिनांक १५/०२/२०२३

सातवा **सुधारीत प्रशासकीय मान्यता अहवालातील उपशिर्षवार तरतुदी**

(किंमत रुपये कोटी)

| अ.क्र | उपशीर्ष | सहाव्या सुप्रमानुसार तरतुद | सातव्या सुप्रमा नुसार तरतुद |
|---|---|---|---|
| १. | ए- प्राथमिक | ४.३७ | ०.७० |
| २. | बी- भुसंपादन | ५.९१ | ६.०५ |
| ३. | सी- मुख्य कामे | २१२.६१ | २७७.९३ |
| ४. | डी- निमोचक | १.०३ | ०.८९ |
| ५. | इ- प्रपात | ०.०१ | ०.०१ |
| ६. | एफ -RHT Works | १.७५ | १.७० |
| ७. | जी - पुल | ०.३२ | ०.२७ |
| ८. | एच - एस्केप | ०.०३ | ०.०३ |
| ९. | के- इमारती | १.८६ | १.५० |
| १०. | एल - माती काम | ६.४८ | ६.३१ |
| ११. | एम - वृक्षारोपण | ०.२२ | ०.१५ |
| १२. | ओ — संकीर्ण | २.७३ | १.२६ |
| १३. | पी - देखभाल | ६.६२ | ०.५७ |
| १४. | क्यु-हत्यारे व अवजारे | ०.९८ | ०.९० |
| १५. | आर- दळणवळण | ६.८८ | १.२४ |
| १६. | वितरण व्यवस्था | ८.६५ | ८.६५ |
| | **एकुण कामाप्रित्यर्थ** | २६०.४५ | ३०८.१६ |
| | अनुषंगिक खर्च (ईटीपी चार्जेस) | १.८७ | ८.९० |
| | **एकुण** | **२६२.३२** | **३१७.०६** |

PRASAD RAMCHANDRA NARVEKAR

Digitally signed by PRASAD RAMCHANDRA NARVEKAR
DN: CN = PRASAD RAMCHANDRA NARVEKAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.02.15 17:25:09 +05'30'

(प्रसाद नार्वेकर)
उपसचिव,महाराष्ट्र शासन